**महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), छत्रपती संभाजीनगर या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश क्र :- आस्थाप-२०२३/ प्र.क्र.२०८/जल-२**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ११ मार्च, २०२४

**शासन आदेश-**

मृद व जलसंधारण विभागातील खालील तक्त्यात नमूद श्री.वि.बा.नाथ (ज्ये.क्र.२) यांना अपर आयुक्त जलसंधारण/मुख्य अभियंता तथा पदसिध्द सहसचिव संवर्गातील पदावरुन महासंचालक/व्यवस्थापकीय संचालक (स्थापत्य) या संवर्गातील पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदावर (वेतनश्रेणी - S-३० (रु.१४४२००-२१८२००/-) निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. श्री.नाथ यांची तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे :

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री.वि.बा.नाथ (ज्ये.क्र.२) | अपर आयुक्त, मृद व जलसंधारण आयुक्तालय, छत्रपती संभाजीनगर | महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), छत्रपती संभाजीनगर (रिक्त पदावर) |

२. सदरची पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपांत, देण्यात येत आहे:

१) सदर पदोन्नती, मा. उच्च न्यायालय मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ वरील मा. सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

२) सदर पदोन्नती, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट पिटीशन स्टॅप नं. १०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅप नं.१०८७८/२०२१ मध्ये दिनांक २५ मे, २०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

३) सदर पदोन्नती ही “अपर आयुक्त जलसंधारण/मुख्य अभियंता तथा पदसिध्द सहसचिव” या संवर्गाच्या अंतिम जेष्ठतेच्या व त्यामध्ये होणाऱ्या बदलांच्या अधीन राहील. त्यामुळे तात्पुरत्या पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवाजेष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

४) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना दि.२१/०६/२०२१ अन्वये "महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१" प्रसिद्ध केलेली आहे. सदर अधिसूचनेतील सर्व अटी व नियम सदर आदेशाद्वारे पदोन्नत होणाऱ्या सर्व अधिकाऱ्यांना लागू राहतील.

५) श्री.नाथ यांना देण्यात आलेली पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना किंवा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवत आहे.

३. श्री.नाथ यांनी पदस्थापना केलेल्या पदावर तात्काळ रुजू व्हावे व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. श्री.नाथ यांनी महासंचालक/व्यवस्थापकीय संचालक (स्थापत्य) या संवर्गातील उपरोक्त पदाची निव्वळ तात्पुरती पदोन्नती न स्वीकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही क्र.२०१५/प्र.क्र.३०३/का-१३, दि.१२/९/२०१६ अन्वये कार्यवाही करण्यात येईल.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०२४०३१११२२६०९०५२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

YUVRAJ BAYAJI AJETRAO

Digitally signed by YUVRAJ BAYAJI AJETRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a34e563dd43e83b04db3eb31230d59c1af4b6e29ee6c1f13e338b0ccd51689af, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C01C962D08BD39997D4C4D6E7E19F8ACF340D1A5C4DD2B9A00977369607BBF82, cn=YUVRAJ BAYAJI AJETRAO
Date: 2024.03.11 12:38:16 +05'30'

**( युवराज अजेटराव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव राजभवन, महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री महादयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री, मृद व जलसंधारण महोदय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल ½ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
७. अप्पर मुख्य सचिव (सेवा ) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव, (मृद व जलसंधारण) मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
९. आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छत्रपती संभाजीनगर
११. विभागीय आयुक्त (सर्व)
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, महाराष्ट्र राज्य (सर्व)
१३. अपर आयुक्त जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र,पुणे/नागपूर
१४. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग (सर्व)
१५. प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी, पुणे/छत्रपती संभाजीनगर/नागपूर
१६. जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग (सर्व)
१७. जिल्हा जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद (लघु पाटबंधारे) विभाग (सर्व)
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर
१९. श्री.वि.बा.नाथ, अपर आयुक्त, मृद व जलसंधारण आयुक्तालय, छत्रपती संभाजीनगर (ईमेलव्दारे)
२०. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव तसेच सर्व कार्यासने (मृद व जलसंधारण विभाग)
२१. निवड नस्ती, जल-२.